पोलीस उपमहानिरीक्षक [प्रशिक्षण व विशेष पथके] नागपूर यांना प्रादेशिक कार्यालय प्रमुख म्हणून घोषित करणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग.
शासन निर्णय, क्रमांक-टिईएफ१०३९९/सीआर-२५२५/पोल-५ [अ]
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक- २ डिसेंबर, १९९९

वाचा:- अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व विशेष पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे क्रमांक-प्रशिक्षण/लेखा/४/१[१]/मुख्या/९९/१००८/दिनांक २० सप्टेंबर, १९९९ चे पत्र.

निर्णय:- शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक आयपीएस१७९८/प्र.क्र.४३३/पोल-१ दिनांक-१९ मार्च, १९९९ अन्वये पोलीस अधिक्षक [प्रशिक्षण व विशेष पथके] महाराष्ट्र राज्य, मुंबई, या पदाची पोलीस उपमहानिरीक्षक [प्रशिक्षण व विशेष पथके], नागपूर अशी श्रेणीवाढ करुन त्यांचे मुख्यालय नागपूर असे करण्यात आले आहे. त्यामुळे पोलीस उपमहानिरीक्षक [प्रशिक्षण व विशेष पथके] महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना प्रादेशिक कार्यालय प्रमुख म्हणून घोषित करणे व वित्तीय अधिकार प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

3. वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उप विभाग एक मधील अ.क्र.३ नुसार पोलीस उपमहानिरीक्षक [प्रशिक्षण व विशेष पथके] महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना प्रादेशिक कार्यालय प्रमुख म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील नियम २ व १४ आणि वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उपविभाग-एक, मधील अ.क्र.९ नुसार नियंत्रक अधिकारी, व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हे आदेश वित्तीय नियम पुस्तिका १९७८, भाग-१ उपविभाग-१ मधील परिशिष्टातील अ.क्र.१ नियम-२ अन्वये प्रशासकीय विभागांना असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ शि.श.धुमाळे ]
उपसचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

...

प्रति,
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई,